राज्य उत्पादन शुल्क विभागातील गट-अ व गट-ब मधील निलंबित राजपत्रित अधिकाऱ्यांच्या बाबतीत प्रशासकिय विभाग स्तरावर निलंबन आढावा समितीचे गठण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इएसटी-२७१५/प्र.क्र.३२/राउशु-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २३ मार्च, २०१५

वाचा

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक निप्रआ १११११/प्र.क्र.८६/११-अ,दि.१४.१०.२०११.
२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक अभियो १३१२/प्र.क्र.३०/पूर्नबांधित-१, दि. १२.०२.२०१३.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक अभियो- १३१४/ प्र. क्र .८६/११-अ दि. ३१.०१.२०१५.

गट-अ व गट- ब मधील राजपत्रित अधिकाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्यासाठी संदर्भाधीन दि.१४.१०.२०११ च्या शासन निर्णयान्वये मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली “निलंबन आढावा समिती” गठीत करण्यात आली आहे. या समितीऐवजी संबंधीत प्रशासकिय विभागांनी विभागीय सचिवांच्या अध्यक्षतेखाली निलंबन आढावा समिती गठीत करण्याच्या सूचना सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधिन दि.३१.०१.२०१५ च्या शासन निर्णयान्वये दिल्या आहेत. त्याअनुषंगाने राज्य उत्पादन शुल्क विभागातील निलंबित अधिकाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्यासाठी निलंबन आढावा समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

राज्य उत्पादन शुल्क विभागातील निलंबित राजपत्रित अधिकाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्यासाठी खालीलप्रमाणे “निलंबन आढावा समिती” गठीत करण्यात येत आहे :-

१) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (राउशु) : अध्यक्ष

२) अतिरिक्त पोलीस महासंचालक,
लाचलुचपत प्रतिबंधक विभाग : सदस्य

३) उपसचिव/सहसचिव (पोल-२), गृह विभाग : सदस्य

४) उपसचिव/सहसचिव (राउशु), गृह विभाग : सदस्य सचिव

२. समितीची कार्यकक्षा:-

अ) या समितीने शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ३१.१.२०१५ मधील परिच्छेद-५ मधील कार्यपध्दतीचे अनुपालन करुन राज्य उत्पादन शुल्क विभागातील निलंबित राजपत्रित अधिकाऱ्यांच्या प्रकरणांचा आढावा घ्यावा.

ब) निलंबन करण्यास अथवा मागे घेण्यास सक्षम प्राधिकारी यांना सदर समितीने आपल्या शिफारशी सादर कराव्यात.

क) लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून प्राप्त झालेल्या व विभागाकडे ९० दिवसापेक्षा जास्त कालावधीसाठी प्रलंबित असलेल्या अभियोग मंजूरीच्या प्रकरणांचा, निलंबित अथवा निलंबनाशिवाय पुन:स्थापना/नेमणुक करतांना अकार्यकारी पदावर नियुक्ती आहे किंवा कसे याची तपासणी करणे आणि लाचलुचपत/फौजदारी प्रकरणात न्यायालयाने शिक्षा केलेल्या कर्मचाऱ्यांवर कारवाई करणे या बाबींचा आढावा घेऊन संबंधितांना जलद निपटारा करण्याबाबत कार्यवाही करावयाच्या सूचना समितीने द्याव्यात.

ड) क्षेत्रिय स्तरावरील गट-क व गट-ड मधील कर्मचाऱ्यांबाबत अभियोग दाखल करावयाच्या प्रलंबित प्रकरणाचा प्रत्येक महिन्याच्या पहिल्या आठवडयात आढावा घेऊन त्यासंदर्भातील अहवाल मुख्य सचिव तसेच अपर मुख्य सचिव, गृह विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या दहा तारखेपर्यंत पाठविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२३१२४२५४६१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ankush S Gharge

Digitally signed by Ankush S Gharge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ankush S Gharge
Date: 2015.03.23 12:56:33 +05'30'

(अं. शा. घार्गे)
सहसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

४) अप्पर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय, मुंबई.

५) अप्पर मुख्य सचिव (सेवा/साप्रवि), मंत्रालय, मुंबई.

६) प्रधान सचिव (राउशु), गृह विभाग, जी.टी. हॉस्पिटल आवार, ७ वा मजला, मुंबई.

७) सहसचिव (पोल-२), गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय, मुंबई.

प्रत: मा. मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.